श्रीधर तिळवे

# मराठी संस्कृतीच्या आत्महत्येस शुभेच्छा

आपल्या राज्यातील, देशातील व जगातील अशा तीन स्तरावरील समकालीन मुद्यांवरचे, समस्येविषयी भाष्य करणारा हा स्तंभ–

प्रिय मराठी संस्कृती,

कालच पत्राऐवजी तुझा इ मेल आला आणि दचकलो कारण मी माझा इ मेल आयडी कुणालाच देत नाही. तू आत्महत्या करायला चालली आहेस हा त्यामधला तुझा मेसेज करून दचकलो. खरेतर तुझे असे आत्महत्येचे मेसेज अधूनमधून, पत्रांतून येतात, पण हा इ मेल असल्याने जरा ज्यादाच सिरियस वाटला. तो वाचून तुला नेहमीसारखे अडवावेसे वाटले, पण आज मात्र मी तुला अडवणार नाही. तू म्हणशील, ''का?'' तर ऐक. कदाचित माझा एकेक प्रश्न तुला फार बोचणारा वाटेल, पण कधीतरी असे बोचणारे प्रश्न विचारणे गरजेचे असते.

कुठलीही संस्कृती जगायची असेल तर तिची आध्यात्मिक धारा जिवंत व सळसळती असायला लागते. धर्माच्या, पैशांच्या पाट्या टाकून ही धारा जिवंत राहत नाही, तर त्यासाठी त्या संस्कृतीच्या पोटी मोक्ष,मुक्ती, निर्वाण प्राप्त झालेली महाव्यक्ती निर्माण व्हावी लागते. तुकारामानंतर तुझ्या पोटी अशी एक तरी व्यक्ती जन्मली का? रामकृष्ण परमहंस, रमण महर्षी, ओशो, जे. कृष्णमूर्ती यांच्यासारखी संपूर्ण अध्यात्मच पालटवणारी एकही व्यक्ती तुझ्या पोटी का जन्मली नाही? मी आध्यात्मिक व्यक्ती म्हणतोय मराठी संस्कृती, धार्मिक नव्हे. तुझ्या पोरांना या दोन्हीतला फरकही आता कळत नाही काय? विश्वाला उपलब्ध होऊन बुद्ध होणे आणि बुद्ध झालेल्यांविषयी पंडिती चर्चा करणे, यांतला भेद यांना समजत नाही काय?

सृष्टीच्या संदर्भात किती संशोधक निर्माण झाले? या संशोधकांपैकी किती जणांना इथल्या वांझोट्या आणि कागदखाऊ वर्तमानपत्रांनी आणि माध्यमांनी प्रसिद्धी दिली? किती जणांची संशोधने मराठीत प्रसिद्ध झाली? पुरोगामी पुरोगामी म्हणून छाती पिटणाऱ्या तुझ्या महाराष्ट्रात एकही जगदीशचंद्र बसू वा डॉ. खुराना वा चंद्रशेखर निर्माण का झाला नाही? नारळीकर एकाच सिद्धांतानंतर का योगदान देऊ शकले नाहीत? त्यांचा वैज्ञानिक म्हणून गौरव करताना ''अहो नारळीकर, या सिद्धांतानंतर तुमच्या क्षेत्रात एवढी उलथापालथ झालीय. तर तुमचे पुढे काय?'' असा प्रश्न का विचारला गेला नाही?

मी जानेवारी महिन्यात दिल्लीत होतो. तर तिथे ''मुंबई ही बुद्धीची आता दफनभूमी झालीय. तिथे आता काय उरलंय?'' हा प्रश्न मला विचारण्यात आला आणि मी गप्प झालो. दिल्ली विद्यापीठात अत्यंत अद्ययावत वाचन असलेले अनेक विद्यार्थी मला भेटले आणि मुंबई विद्यापीठाचा मागासलेपणा आठवून मी विषण्ण झालो. गेली काही वर्षे, मराठी संस्कृते, तू दुय्यम

दर्जाच्या विचारवंतानाच का प्रमोट करत आहेस? फुले, आंबेडकर, सावरकर, टिळक, रानडे, हेडगेवार वगैर सर्वच आता पुराणवस्तुसंग्रहालयात ठेवण्याचे विचारवंत झालेत. हे या तुझ्या पोरांना कुणी सांगणार आही की नाही? की १९५० पूर्वीचे जग जसेच्या तसे आहे अशी लोकांची समजूत आहे? सतत बदलास तयार असणाऱ्या फुले आंबेडकरांना आता आजच्या विचारवंताची अवस्था बघून काय वाटले असते. ''बांबांनो, आमच्यातले जे चांगले आहे ते आत्मसात करा आणि जे कालबाह्य झालंय ते फेकून आजच्या जगाला ताज्या दमाने तोंड द्या.'' असेच यांनी सांगितले नसते का? ज्या बिहार, उत्तरप्रदेशाला हे तुझे लोक मागासलेले समजतात त्यांच्याही संस्कृतीत समकालीन जागतिक विचारांशी नाते सांगणारे लोक संख्येने अधिक आहेत याची यांना कल्पना तरी आहे का? की ज्यांना हे भैय्ये समजतात ते येत्या वीस वर्षात महाराष्ट्राला वैचारिक क्षेत्रात हरवणार आहेत हे उमजून न घेता हे आपल्या पराभवाची वाट पाहतायत? बघता बघता मा. कृष्णराव, व्ही. शांताराम रिप्लेस होऊन यश चोप्रा, महेश भट्ट वगैरेंचे राज्य आले तसेच वैचारिक क्षेत्रात घडण्याची हे लोक वाट पाहतायत का? शिवाजी आणि आंबेडकरांच्या नावाने घोषणा देऊन कुणी पुरोगामी होत नाही हे यांना कधीतरी कळणार आहे का?

मराठी संस्कृते (हे व्याकरणदृष्ट्या पुरेसे शुद्ध नसलेले रूप वापरतोय याबद्दल क्षमा कर.) आज अवस्था अशी आहे, की मुंबईतून तू फेकली गेलीयेस, पुण्यात तू हद्दपार होण्याच्या मार्गावर आहेस, तर कोल्हापूर सारख्या ठिकाणी हद्दपार होण्याच्या तयारीत आहेस. आता अवस्था अशी आहे, की एकतर तुला मरावे लागेल किंवा अखंड भारताला मरावे लागेल. दोन्ही एकाचवेळी जिवंत राहणे कठीण आहे. ज्यांना याबाबत भोळी आशा वाटत्ये त्यांना वाटू दे. पण भारतभरातले प्रचंड लोंढे इथे आल्यावर तू शाबूत राहशील असे मला वाटत नाही, सर्वात वाईट म्हणजे येणाऱ्यांचा माज वाढ चाललाय. त्यांना तुझ्याशी कसलंही देणघेणं नाही. मराठी भाषा शिकावी लागते म्हणून तोंड वाकडं करणाऱ्यांची संख्या व प्रमाण परप्रांतियांच्यात वाढतच आहे, तुझी अवस्था अमेरिकेतल्या मूळ अमेरिकनांच्या संस्कृतीसारखी होत चालल्ये. काही वर्षांनी तू मूळ अमेरिकनांप्रमाणे नाहीशी होशील आणि इंग्रजी व हिंदी याच तुझ्याही लोकांच्या मातृभाषा होतील. जगातनं अर्धमागधी व पाली भाषा गेल्या बुद्धाचे वा महावीराचे मूळ वाङ्मय या भाषेत असूनही गेल्या. तुझ्यातही ज्ञानेश्वर, तुकाराम आहेत. तरीही तू मरणार आहेस. महाराष्ट्रातून मराठी मराठीतून इंग्लो-मराठी तयार होईल. अशी आशा अनेकांना वाटते पण इंग्लो-मराठी बोलणारे लोकही हळूहळू घटतच जातील. हे सर्व टाळायचे तर भारतातून फुटून जाऊन स्वतंत्र महाराष्ट्र राष्ट्र उभे करावे लागेल. ते करण्याची तयारी मराठी माणसाची आहे का? खलिस्तान व काश्मिर चळवळी दडपणारे दिल्लीपती गप्प बसणार आहेत का, मराठी माणसाविषयीचा राजकीय आकस दिल्लीत प्रचंड आहे. इथे पंजाबी, तेलगु माणूस पंतप्रधान, राष्ट्रपती होऊ शकतो. पण मराठी माणूस होऊ शकत नाही. यामागचे कारण काय? भारत हे राष्ट्र टिकवण्यासाठी तुझा बळी देणे किती योग्य व किती अयोग्य? मराठी संस्कृतीचे कॉर्नरिंग सर्वच बाजूंनी होणे अटळ आहे. अशावेळी काय करायचे? केवळ स्वत:ची लोकसंख्या वाढवत नेऊनही मूळ संस्कृतीचा ऱ्हास करता येतो हे यु.एस.ए. अमेरिका, ऑस्ट्रेलिया न्यूझीलंड वगैरे राष्ट्रांनी सिद्ध केले आहे. महाराष्ट्रात तरी वेगळे काय घडते आहे? एक दोन शतकानंतर तूही नष्ट झालीस तर आश्चर्य ते काय?

बाहेरून येणारे लोक हे नेहमीच जगण्याची अधिक उर्जा घेऊन येतात किंबहुना त्यांच्याकडे जगण्याची अधिक उर्जा असते म्हणूनच ते स्थलांतर करू शकतात. अनेकदा ते त्या त्या राज्याचे क्रीम असतात, सर्वोत्कृष्ट असतात. आज प्रत्येक मराठी माणसाला या सर्वोत्कृष्टांशी लढावे लागते. त्यात जे महाराष्ट्रातले सर्वोत्कृष्ट आहेत ते यशस्वी होतात ते या भारतीय स्पर्धेत आपली जागा बनवतात. पण असे लढू शकत नाहीत त्या मराठी माणसांचे काय? आता प्रत्येक मराठी माणसालाच सर्वोत्कृष्ट बनणे गरजेचे झाले नाही काय? साधी श्रमाची कामेही बिहारी आणि युपीतली माणसे कमी मोबदला घेऊन मोठ्या प्रमाणात करतात अशावेळी मराठी माणसाला त्यापेक्षाही कमी मोबदला घेऊन काम करणे सक्तीचे होत नाही का? स्थलांतरामुळे श्रमाचे मूल्य व किंमत घटत नाही काय? कुठलीही भांडवलशाही स्थलांतरांना उत्तेजन देते कारण तिला कमीत कमी किंमतीत जास्तीत जास्त काम हवी असतात. असे श्रम स्थलांतरित अधिक चांगल्या तऱ्हेने करतात. खरेतर स्थलांतरित श्रम आणि अस्थांतरित श्रम अशा दोन अर्थशास्त्रीय कॅटगरीज तयार करून स्थलांतरित श्रमामुळेच सर्वच श्रमाच्या किंमती घटत जातात हे सहज सिद्ध होते. जिथे स्थलांतरित श्रम वाढतात, तिथे श्रमाच्या किंमती व मूल्यं घटत जातात. यामध्ये अस्थलांतीरत श्रमाचे व श्रमिकांचे प्रचंड नुकसान होते. महाराष्ट्रातही मराठी माणसाच्या श्रमाचे व मराठी श्रमिकांचे असेच नुकसान होत नाही का?

मराठी संस्कृते आजही तुझी सर्वोच कामगिरी कुठल्या क्षेत्रात आहे? तर कवितेत! पण मराठी माणसाने या कवितेचे कितपत कौतुक केले. आज ज्यामुळे जगात मराठीचे नाव आदराने घेतले जाते ते ज्ञानेश्वर, तुकाराम, एकनाथ, नामदेव, अरुण कोलटकर, भालचंद्र नेमाडे, मनोहर ओक, नामदेव ढसाळ हे गंभीर कवी मराठी माणसाने वाचले का? वाचतो का? गीतकारांना कवी आणि ग.दि. माडगूळकरांना 'महाकवी' म्हणणाऱ्या मराठी माणसांची लायकी काय? पाडगावकर,सुधीर मोघे वगैरेंना जगात कुणी हिंग लावूनसुद्धा विचारत नाही. याची

मराठी माणसाला कल्पना आहे का? की गंभीर कविता मराठी माणसाला वाचायचीच नाहीये? जग ज्या मराठी साहित्यिकांची नावे घेते ते साहित्यिक, कवी मराठी माणूस मात्र वाचत नाही. हा मराठी माणसांचा करंटेपणाच नव्हे काय? मराठी वृत्तपत्रे नेहमी निकृष्ट वाङयच का प्रमोट करत असतात? की या सर्व वृत्तपत्रांत वाङ्मयीन ठोंबे बसले आहेत? विजय तेंडूलकर, वृंदावन दण्डवते, महेश एलकुंचवार यासारखे अव्वल गंभीर नाटककार नेहमीच मराठी माणसाला दूरचे का वाटतात? कुठलीही संस्कृती आत्मसंस्कृती आणि लोकसंस्कृती अशा दोन पातळ्यांवर वावरते. मराठी आत्मसंस्कृती ही आत्मकलावंतांनी नेहमीच अव्वल दर्जाची बनवत ठेवली. पण या आत्मसंस्कृतीकडे मराठी माणूस नेहमी पाठ करून उभा का? गायतोंडे, बर्वे सारखे चित्रकार इथे इतके उपेक्षित कसे? रोहिणी भाटे, लीला भागवतांनी जे मराठी काम केलंय त्याला इतका थंड प्रतिसाद का? मराठी माणसाला आत्मसंस्कृतीबाबत काडीचीही अक्कल नाही असा निष्कर्ष काढला तर त्यात चूक काय? मराठी माणसाची अभिरूची थर्डरेट थर्डक्लास झाली आहे काय?

आत्मसंस्कृती सोडून लोकसंस्कृतीकडे वळले तर काय? हिंदी कमर्शिअल चित्रपट मराठी माणूसच चालवतो. हिंदीची मुंबई टेरीटरी अनेकदा किमान दहा बारा करोड कलेक्ट करून देते. त्यांतील सहा करोड मराठी माणसाचे असतात. हे सहा करोड मराठीच्या मागे का उभे राहत नाहीत? सुरुवातीला 'आनंदवन,' 'बेधुंद मनाची लहर' सारख्या उत्कृष्ट सिरीयल्स आल्या पण मराठी माणसाने नंतर शेवटी 'चार दिवस सासूचे' चालवून आपली लायकी सिद्ध केली नाही काय? मराठीने दिलेले उत्तम व्यवसायिक चित्रपट किती? स्मिता तळवलकरांना आजही एवढी तंगडतोड का करावी लागते? मराठी पॉप्युलर गाणी १९८० नंतर निर्माण व्हायची का थांबली? 'प्रिय' 'जगू कसा तुझ्याविना मी राणी ग' नंतर मराठीत काहीच नसावे? 'ऐका दाजिबा'सुद्धा हिंदीची किनार घेऊन हीट व्हावे? महेश कोठारे, सचीन यांना आजसुद्धा मराठी चित्रपट निर्माण करताना पुरेसा आत्मविश्वास न यावा?

मराठी संस्कृते, अथपासून इतिपर्यंत मराठी माणूस हा एक थर्डरेट, थर्डक्लास कल्चर चालवणारा सांस्कृतीक कणा नसलेला भंगार, विदूषक माणूस आहे. म्हणूनच महाराष्ट्राची लाडकी सांस्कृतिक व्यक्तिमत्वे तीन १) प्र.के. अत्रे २) पु.ल. देशपांडे ३) दादा कोंडके. मराठी संस्कृते, तुझी लायकी मरण्याचीच आहे. त्यामुळेच तू आत्महत्या करायला चालीयेस, तर तुला मी अडवणार नाही तुझ्या आत्महत्येस माझ्या हार्दिक शुभेच्छा!

तुझा
श्रीधर तिळवे

***

## क्रिकेटमधली राष्ट्रीय (?) आपत्ती (?)

भारतीयांच्या दांभिकपणाचे सर्वात मोठे दोन आविष्कार कुठले? असा प्रश्न कुणी मला विचारला तर त्याला माझे उत्तर १) हिंदीला राष्ट्रभाषा म्हणणे आणि घटनेपासून सर्वत्र इंग्रजी ही राष्ट्रभाषेसारखी वापरणे. २) हॉकीला राष्ट्रीय खेळ म्हणणे आणि क्रिकेटसाठी सर्व राष्ट्राने जीव पणाला लावणे आहे. त्यामुळेच विश्वचषकातला लाजीरवाणा पराभव ही राष्ट्रीय आपत्ती असल्यासारखी चर्चा आपण करतोय. मी स्वत: अनेक खेळ खेळलो. फुटबॉल व क्रिकेट सर्वाधिक खेळल्या जाणाऱ्या या दोन खेळात गल्लीचे नेतृत्वही केले आणि संघटनेचे प्राथमिक शिक्षण मी यावेळीच घेतले. नंतर मात्र मी क्रिकेटच आपला राष्ट्रीय खेळ का व्हावा? या प्रश्नाने भणाणून गेलो. आज त्याची कारणे मला उमगतायत. ही कारणे पाहण्याआधी क्रिकेट हा फक्त इंग्रजांचा खेळ आहे यावर माझा विश्वास नाही, हे मी आधीच स्पष्ट करतो. भारतात चेंडूफळी हा खेळ फार पूर्वीपासून खेळला जात होता. जगभरच अशा प्रकारचा एका खेळ खेळला जात होता असे दिसते. मात्र वेगवेगळ्या देशात त्याला वेगवेगळे रूप प्राप्त झाले असे दिसते. भारतात ब्रिटिशांनी क्रिकेट आणले, तेव्हा तो चेंडूफळीपेक्षा अधिक शास्त्रोक्त व शिस्तबद्ध होता. त्यामुळे आपल्याला ते मानवत गेले.

क्रिकेट ब्रिटिशकाळात वाढले त्याचे कारण म्हणजे राज्यकर्त्या ब्रिटिश अधिकाऱ्यांना व संस्थानिकांना पॅव्हेलियनमध्ये बसून तो खेळता येई व मैदानावर वेळप्रसंगी फिल्डींगला बदली खेळाडू पाठवता येत असे. दुसरे कारण या खेळात बॅटींग करणाऱ्या माणसाला मैदानभर पळावे लागत नाही उभ्या उभ्या हालचाल करून खेळता येते. भारतीयांच्या आळशी स्वभावाला त्यामुळे ते मानवले. तिसरे कारण आपल्या जातीव्यवस्थेत आहे. भारतात क्रिडा संस्कृती विकसित न होण्याचे सर्वात मोठे कारण जातीव्यवस्था आहे. जे लोक एकमेकाला स्पर्श करत नाहीत एकमेकाच्या घरात जेवत नाहीत ते एकमेकाशी काय खेळणार? शिवाय प्रत्येक खेळात मैदानावर प्रत्येक खेळाडू समान असतो भारतीयांच्या जातीनिष्ठ प्रवृत्तीला ही समानता कशी झेपणार? खेळ हे एकत्र करायचे कृत्य आहे. आणि तेही सर्व समान या भावनेने. भारतीयांची आजही याला पुरेशी मानसिक तयारी झालेली नाही. अशावेळी त्यातला त्यात क्रिकेट हा एकच खेळ असा होता, की जिथे प्रतिस्पर्ध्याचा कमी स्पर्श होतो किंवा अजिबातच होत नाही. त्यामुळेच तो भारतीयांना मानवला. ज्या खेळात स्वत:च्या संघातील खेळाडूनांही फारसा स्पर्श करावा लागत नाही, तो भारतीयांचा राष्ट्रीय खेळ कसा झाला यात आश्चर्य ते काय? भारतात सध्या जातीयतेचे जे राजकारण चाललंय ते पाहता एक दिवस ब्राह्मणांचा संघ वेगळा, यादवांचा वेगळा, महारांचा वेगळा असे काही झाले तरी आश्चर्य वाटावयास

नको. पुढे मागे खेळातही राखीव जागा निर्माण झाल्या तर त्याचेही आश्चर्य वाटू नये. असो. तर क्रिकेट हा तसा त्यातला त्यात सोयीचा खेळ असल्याने तो फोफावला. हा खेळ इंग्लीश असल्याने इंग्लीश प्रसारमाध्यमांनी तो अधिकच भरभराटीस आणला. या वर्ल्डकपमध्ये सर्व मॅन ऑफ द मॅच वाल्यांना इंग्रजीत बोलण्याची सक्ती करण्यात आली होती. पण त्याचा साधा निषेधही भारतातून झाला नाही. पाकिस्तानने निषेध नोंदवला. पण त्याचे पुढे काय झाले ते कळले नाही. त्यावरून इंग्लीश माध्यमांना तो किती इंग्लीश वाटतो हे स्पष्ट व्हावे. क्रिकेट वाढण्याचे पाचवे कारण क्रिकेटमध्ये राष्ट्रीय संघ फार कमी त्यामुळे जगात तुम्ही तळाला असला तरी आपोआपच सहावे-आठवे असता. त्यामुळे एक खोटे समाधान पूर्वी मिळायचे. इतर खेळात आपला राष्ट्रीय संघ दुसऱ्या राष्ट्रीय संघाशी, जो पहिल्या क्रमांकावर आहे, भिडतोय ही कल्पना हॉकी सोडता अशक्यच. त्यामुळे साहजिकच निदान पहिल्या, दुसऱ्या क्रमांकवाल्याशी लढतोय असे खोटे समाधान मिळत होते. सहावे कारण हा एकच खेळ असा होता की जिथे वर्ल्डकपसाठी आपणाला चान्स होता. प्रवेशाची आणि जिंकण्याची संधी होती व आहे. पूर्वी जागतिक पातळीवर क्रिकेट खेळायला प्रवेश पात्रता फेरी खेळण्याचीही खेळात गरज नव्हती. आपणाला थेट प्रवेश होता. त्यामुळेही क्रिकेट वाढले. सातवे कारण १९७१ ला विंडीजवर मिळवलेला वाडेकरच्या संघाचा विजय. आपण जगातल्या नंबर एकला हरवू शकतो, हे प्रथमच आपण हॉकीखेरीज अनुभवले. त्यामुळे हॉकी आणि क्रिकेट काही काळ समांतर धावले, पुढे हॉकीत आपले स्थान ढेपाळले आणि नेमक्या त्याच वेळी आपण क्रिकेटमध्ये विश्वचषक पटकावला आणि मग सगळा देशच क्रिकेटमय झाला. हॉकीनंतर प्रथमच विश्वगौरव प्राप्त झाला. आठवे कारण या खेळाची लांबी आणि या देशातील बेकारीची लांबी समान असल्याने दिवसभर टाईमपास करण्यासाठी क्रिकेटसारखी करमणूक नाही. या बेकारीने आणि बेकार लोकांनी खऱ्या अर्थाने क्रिकेट वाढवले, आयता प्रेक्षक व खेळणारा मोठा वर्ग तयार केला. ही बेकारीतली सवय मग नोकरीधंदा करतानाही कायम राहिली. त्यामुळेचे क्रिकेटमध्ये जी हार झाली तिला राष्ट्रीय आपत्तीचे स्वरूप आले आहे. किमान तेरा दिवसाचे सुतक अटळ आहे.

आता प्रश्न असा, की आपण का हरलो? ग्रेग चॅपेलचा TOI मधला दिनांक ७ एप्रिलचा इंटरव्ह्यू वाचला, की चॅपेलचा किती बारीक अभ्यास आहे असे कुणालाही वाटेल. पण स्पष्टच सांगायचे, तर या पराभवाला चॅपेल आणि द्रवीडच जबाबदार आहेत. BCCI ने खेळाडूंना सर्व काही दिले होते. त्यामुळे BCCI ला जबाबदार धरण्यात काहीच अर्थ नाही. आपला संघही थोर नसला तरी चांगला होता. मग चुकले कुठे? तर चॅपेलना मॅनेजमेन्ट कळली पण मॅनेजमेन्टचा मूलभूत नियमच कळले नाहीत. कुठल्याही मॅनेजमेन्ट स्ट्रॅटेजीमध्ये शेवटच्या फेजमध्ये तुमच्या पोझीशन्स फिक्स असणे गरजेचे असते. चॅपेल वर्ल्डकपमध्येही प्रयोग करत होते आणि तेही फालतू! वास्तविक सचीन हा जगातला बेस्ट ओपनर, पण त्याला विनाकारण चौथा क्रमांक! तिसऱ्यावर द्रवीड, पाचव्या क्रमांकाला युवराज, सहाव्याला धोनी बेस्ट. पण चॅपेलनी निष्कारण फिरवाफिरव केली. कारण काय तर ओपनिंगला खेळणे सोपे, तर मधल्या फळीत अवघड. वास्तविक वन डेत ओपनिंग सर्वात महत्त्वाची, विशेषत: तुम्ही टोटल फॉलो करत असता, तेव्हा तर ती फार महत्त्वाची! तिथे सचीनला खेळवायचे सोडून इतरांना संधी! ही संधी का? तर राहूलला त्याचा लाडका सेहवाग संघात हवा म्हणून, राहूलच्या या एका आग्रहापोटी संघांचा समतोल गेला. पहिल्या क्रमांकाला गांगुली किंवा उथप्पा किंवा सेहवाग यांच्यापैकी एकाचीच निवड होऊ शकत होती तिसऱ्यासाठी द्रवीड होता. चौथी जागा रिकामी होती. पाचव्याला युवराज. सहाव्याला धोनी. सातव्यासाठी एक ऑल राऊंडर आठ, नऊ, दहा, अकरासाठी गोलंदाज हीच रचना हवी होती. कार्तिक हा युवराजचा पर्याय होता. चॅपेलनी संघ बांधताना चौथा व सातवा क्रमांक घडवायला हवा होता. ते करायचे सोडून जे घडलेले आहेत त्यांच्यावर प्रयोग करत निव्वळ वेळ घालवला. द्रवीडनेच रमेश पोवार ऐवजी हरभजन, कुंबळे निवडून आणखी घोळ घातला. खरेतर सौरवला चौथ्या क्रमांकासाठी घडवणे अवघड नव्हते. पण मग सचीनला कसा शह देता झाला असता? ज्या तरुण खेळाडूंच्या चर्चा सध्या मिडीया करत्येय त्यातल्या एकालाही तीसची सरासरीही गाठता आलेली नाही. हे मिडीयाला कुणीतरी सांगणे गरजेचे आहे. आजही सचीनबरोबर कोण? चौथ्या क्रमांकावर कोण? आणि सातव्या क्रमांकावर आवश्यक असलेला ऑल राऊंडर कुठाय? या प्रश्नाची उत्तरे मिळालीच नाहीत आणि आपण फालतू प्रश्नांच्या चर्च करतोय. गोरी चमडी काहीही बोलली, की ते खरं, असं मानून चॅपेलच्या सूचनांवर चर्चा सुरू आहे. पण खरे तर चॅपेल जे सांगतोय तेच वर्षानुवर्षे अजित वाडेकर, सुनिल गावस्कर आणि कपीलदेव सांगतायत. पण गोऱ्या कातडीचा शिक्का बसल्यावरच ते ऐकले जाईल असं आता दिसतंय. शरद पवारांना कुणीतरी जाऊन सांगा रे, ''म्हणावं ग्रेग चॅपेल म्हणजे सोनिया गांधी नव्हे!''

***

## जागतिक उष्मावाढ (Global Warming)

१८९६ साली वैज्ञानिक स्वॉन्ते ॲरहनीस याने कोळसा किंवा तत्सम पदार्थामधून $CO_2$ बाहेर पडला, की उष्मावाढ होते हे सिद्ध केले. तेव्हा त्याला जाणवलेही नसेल, की याचा हा हाताएवढा सिद्धांत पुढे आख्ख्या पृथ्वीला व्यापणार आहे. त्यानंतर १९७९ साली नॅशनल अकादमी ऑफ सायन्स,

'अमेरिका, या संस्थे'ने ॲरनीसने जो 'ग्रीनहाउस इफेक्ट'चा पाया घातला होता, त्याचा विस्तार करून जगभर जागतिक उष्माघात होत असल्याचा रिपोर्ट दिला. मात्र जगाला याचे धक्के बसले ते १९९४ ते २००६ या दरम्यान जेव्हा गेल्या दीडशे वर्षातील सर्वाधिक उकाडे नोंदवले गेले तेव्हा! त्यामुळे पॅरीस येथे झालेल्या परिषदेत (दिनांक ३० जाने. ते ३ फेब्रुवारी २००७) जागतिक हवामानतज्ज्ञ काय रिपोर्ट देतात, याकडे सर्व जगाचे लक्ष लागले होते. हा रिपोर्ट बाहेर आला आणि आता समस्यांचेही जागतिकीकरण झाले आहे हे स्पष्ट झाले. या रिपोर्टनंतरही काही गोष्टी पुढे आल्या. उदा. इंडोनेशियात पामपासून तयार करण्यात आलेले फ्युएल जागतिक एमीझनच्या तब्बल ८% कार्बन डायऑक्साईड हवामानात फेकते हे उघडकीस आले. त्यामुळे २५% एमीसनसाठी अमेरिकेला धारेवर धरणाऱ्या द. आशियाई देशाची चांगलीच पंचाईत झाली. हे ८% पूर्वी काउंट केले नव्हते, ते मोजण्यात आले. इस. १०००-१८०० दरम्यान फक्त २७० पार्टीकल्स कार्बन डाय ऑक्साईडचे होते. ते प्रमाण आता तब्बल ३८० पार्टीकल्सवर पोहचलय. प्रचंड जंगलतोड, त्यामुळे वनस्पतींकडून $CO_2$ शोषण नसणे. कोळसा व पेट्रोलियमचा प्रचंड वापर, पशुपालन शेतीची विचित्र वाढ व कारखान्यांनी सोडलेले उष्णता वाढवणारे गॅस याला जबाबदार आहेत. यामुळे समुद्राची पातळी फूट-दीडफुटानं वाढून मुंबईसारखी किनारपट्टीवरची शहरे बुडण्याची शक्यता आहे. विशेषत: बांगलादेशाचा २०% भाग व मालदीव बेटे तर पाण्याखालीच जातील असा अंदाज आहे. त्याचबरोबर वीस वर्षात आफ्रिका व द. अमेरिकेत पाण्याची टंचाई निर्माण होईल. इ.स. २०५० पर्यंत आशिया पाण्याच्या टंचाईला तोंड देईल. पोलर बीमरसारख्या जीवांचे अस्तित्व नष्ट होईल असा अंदाज आहे. काही वर्षांपुरते उत्तरेकडे पीक व अन्नधान्य वाढेल. मात्र २०८० साली मात्र ते घटत जाऊन नंतर अब्जावधी लोक उपासमारीन मरतील. रोगराई प्रचंड वाढेल. तापमानात १.८ ते ४° पर्यंत वाढ होईल असा अंदाज आहे. २००६ चा उन्हाळा हा गेल्या १२० वर्षातला सर्वाधिक कडक उन्हाळा होता. हे सिद्ध झाल्याने या रिपोर्टचं महत्त्व अधिकच वाढलय. प्रदुषणामुळे गंगा आणि सिंधु या नद्या नाहीशा होण्याची शक्यता आहे. त्याला ही जागतिक उष्मावाढ हातभारच लावणार आहे. कारण प्रथम पूर आणि नंतर पाण्याचा घटणारा प्रवाह हे या उष्मावाढीचे भारतीय फलित आहे. सर्वसाधारणपणे क्षेत्रीय लोकसंस्कृतीत 'निसर्गाचा समतोल' हे एक लाडके तत्त्व आहे. त्याची सत्यासत्यता कुणीच तपासून पाहत नाही. प्रत्यक्षात निसर्गाला स्वत:चा समतोल राखण्यात खरोखरच रस आहे, की हा भ्रम आहे हा एक लाखमोलाचा प्रश्न आहे. 'निसर्ग समतोल स्वत:हून राखेल.' हे तत्त्व माणसाला अनेकदा निष्क्रिय बनवते. कारण मग सर्व जबाबदारी निसर्गावर टाकून रिकामे होता येते. जागतिक उष्मावाढीला निसर्ग निसर्गाचे पाहून घेईल अशी टिपीकल भारतीय प्रतिक्रिया देणे फार सोपे आहे यावर माझा तरी विश्वास नाही. विशिष्ट संस्कृतीत निसर्ग हा केवळ कच्चा माल झाला आणि तो अमर्याद असल्याचा भ्रम पसरला. उष्मावाढीची समस्या या दोन भ्रमातूनच निर्माण झाल्येय. या समस्येचे आकलन मात्र चिन्हीय संस्कृतीतच शक्य झाले आहे. कारण हवामानाच्या अभ्यासाला संगणकीकरणाची मूलभूत आवश्यकता होती व आहे. ही समस्या म्हणजे संगणकीय आकडेवारीतून निर्माण केलेला 'चिन्हीय' भ्रम आहे, असे प्रतिपादन करणारा वैज्ञानिकांचा एक समूहही आहे. माझ्या मते चिन्हीय संस्कृतीत 'निसर्ग' हा एक महाजाल आहे आणि ही उष्मावाढीची समस्या महाजालीय समस्या आहे. हे प्रथमच स्पष्ट

झाले आहे. त्यामुळे तिला सोडवायचे असेल तर सर्वांनी एकत्र येणे गरजेचे आहे. निसर्गाचे पाय कापून त्याला आपणच लंगडे बनवलं आहे आणि आता त्याला बरे करण्याची जबाबदारी आपल्या सर्वांचीच आहे. दुर्देवाने याचबाबतीत कुणी किती जबाबदारी उचलायची यावरून वाद सुरू झालाय. यामागची कारणे उघड आहेत.

एकतर चीन आणि भारत सध्या आर्थिक बाबतीत प्रचंड प्रगती करत आहेत. त्यामुळे विशेषत: चीनला असा दाट संशय आहे, की आपल्याला पायबंद घालण्यासाठी अमेरिका (USA) उष्मावाढीचे कारण पुढे करत आहे. दुसरी गोष्ट $Co_2$ वा तत्सम मिथेन वगैरे, ग्रीनहाउस इफेक्ट घडवणारे वायू मुख्यत: USA तून (जगाच्या २५%) फेकले जात आहेत. त्यामुळे उपाययोजनेतही तेवढाच आर्थिक व इतर भार USA ने उचलावा अशी अपेक्षा आहे. त्यासाठी USA ला तत्सम वायू निर्माण करणाऱ्या अॅक्टीव्हीटीज कमी कराव्या लागतील. (कोळसा व पेट्रोलवर चालणाऱ्या सर्व गोष्टी ज्यात कार आलीच) USA ची याला तयारी नाही. तिसरे कारण, नेहमीप्रमाणेच USA वा युरोपची स्वत:पुरते पाहण्याची वृत्ती! हे दोन्ही समुदाय या उष्मावाढीचे मिळणारे पुढील फायदे-तोटे आत्ता चाचपतायत. इतर जगाच्या तुलनेत याचा सर्वात कमी तोटा यांचा होणार आहे. आर्टिक खंडात जगातले जवळ जवळ २५% तेल व गॅस आहे. रशियाच्या ताब्यातील भागातही दोन ट्रीलीयन डॉलर्सचे मीनरल्स आहेत, इथले जे मोक्याचे बर्फ आहे ते वितळायला अजून शंभर वर्षे लागणार होती. पण या उष्मावाढीमुळे येत्या पंधरा वर्षात हे बर्फ वितळण्याची शक्यता आहे. तसे झाले तर हा खंड नैसर्गिक संसाधनाचा पुरवठा केन्द्र बनणे अटळ आहे आणि त्याचा फायदा घेणे हे युरोअमेरिकन राष्ट्रांना गरजेचे वाटते. त्यामध्ये स्थानिक लोकांची बर्फावर आधारलेली संस्कृती बुडाली तरी पर्वा कुणाला? कारण या हवामानबदलामुळे सायबेरियाचे वाळवंट आणि अलास्काचा बर्फाळ प्रदेश दोन्हीही शेतीस योग्य असे प्रदेश होणार आहेत. त्यामुळेच प्रथम फायद्याची चाचपणी करण्यात USA व युरोप मग्न आहेत. त्याचे बजेट मांडून होईपर्यंत फारशी ठोस कृती करण्याच्या मूडमध्ये दोन्ही समुदाय नाहीत. पाचवे कारण ज्या आफ्रिका खंडावर याचा सर्वाधिक परिणाम होणार आहे आणि या पापात ज्यांचा सहभाग फक्त ५% ते ७% आहे, तो राजकीय व आर्थिक दृष्ट्या कमजोर आहे. त्यामुळे युएसए व युरोप कमी सावध आहेत. एका अर्थाने ही एक विषम परिणाम घडवणारी घटना आहे. ईश्वरी न्याय, नैसर्गिक न्याय वगैरे सगळी परिमाणे कशी खोटी असतात त्याचे हे आणखी एक उदाहरण. निसर्गाला लोकशाही ठाऊक नाही आणि तो आफ्रिकेला सर्वाधिक ठोकणार आहे. त्यामुळे एकीकडे आफ्रिकेत पुरामुळे बुडणारे लोक, घरे व दुसरीकडे हॉलंडमध्ये तरंगती घरे. असे हे विषम दृश्य आहे. या सगळ्या परिस्थितीत भारताने काय करावे?

सुंदरबनातील दोन बेटे बुडाली तरी काही न करणारी भारतीय निर्ढावलेली वृत्ती आता तरी जागी होणार काय? भारतावर या उष्मावाढीचे परिणाम अनेक पातळीवर आहेत. १) काही वर्षांपूर्वी नेहरूंनी तिबेट मध्ये काय आहे असा मूर्ख प्रश्न चीनने तिबेट जिंकल्यानंतर विचारला होता. 'पाण्याचा मुख्य स्त्रोत' हे त्याचे उत्तर त्यावेळी कुणीच दिले नव्हते. हवामानबदलामुळे हिमालयातल्या हिमनद्या सरकतायत आणि २०३० पर्यंत त्या आटून ५ लाख स्क्वेअर किमीवरून थेट १ लाख स्क्वेअर किमी इतक्या उरणार आहेत यामुळे गंगा वगैरे नद्यांचे पाणी कमी होऊन पाण्याची प्रचंड टंचाई निर्माण होणे अटळ! चीनने आगामी पाणीटंचाई ओळखून तिबेटमधले ब्रह्मपुत्रचे पाणी चीनकडे वळवण्याची योजना आखली आहे. यामुळे भविष्यात पाण्यावरून चीन आणि भारतात युद्ध होण्याची शक्यता नाकारता येत नाही. २) समुद्रपातळी वाढली तर समुद्रकाठाकडील ५,७६,४०० हेक्टर जमीन बुडणार आहे. त्यामुळे साधारण ७५ लाख लोक स्थलांतर करतील. त्यांची व्यवस्था कशी लावणार? यातच बांगलादेशचे किनारे बुडून तिथले तीन ते चार करोड लोक भारतात स्थलांतर करतील. (दोन करोड आधीच आलेत.) यामुळे ईशान्य भारतातले प्रश्न अधिक तीव्र होणे अटळ आहे. हे मुस्लिम असल्याने मुस्लिम लोकसंख्येत भर पडेल त्याने वेगळेच प्रश्न निर्माण होतील. ३) भाताची शेती १५% ते ४२% गहू GDP ४% ते ९% घटून त्याचे भारतीय अर्थव्यवस्थेवर गंभीर परिणाम होतील, मुंबईचे २,२८,७०० करोड रुपये नुकसान होईल असाही एक प्राथमिक अंदाज आहे. यामुळे शेतीवर अवलंबून असणाऱ्या लोकांत बेरोजगारी वाढून ते शहरात येतील. त्यामुळे शहरांवर ताण येतील.

वरील सर्व अंदाज, हे अंदाज असले तरी ते खोटे ठरण्याची शक्यता फार कमी आहे. या सर्व गोष्टीच्यावर तातडीने उपाययोजना करणे गरजेचे आहे. जंगलीकरण वाढवणे, लोडशेडींग, वाहनांचा कमी वापर, कार्बन, मिथेन फेकणाऱ्या फॅक्टऱ्यावर बंधने असे काही उपाय आहेत. पण त्याची अंमलबजावणी करण्याची आपणा सगळ्यांचीच किती तयारी आहे? किती झाडे आपण लावणार वा वाचवणार आहोत? निष्कारण वीज जाळणे, फ्रीज, एसी न वापरणे वा कमी वापरणे कितीजण करतील? आपण सगळे बोलबच्चन झालो आहोत. आणि निसर्गाविषयीचे आपले प्रेम दांभिक आहे. त्यामुळे उपाययोजनेविषयी लिहून काय फायदा? जाऊ द्या झालं!

*१६-५३, सी, तपोवन, ना.नि.प. - २,*
*फिल्मसिटी रोड, गोरेगाव (पू.), मुंबई - ४०००६५*
*मो.: ९८९२२२९७३०*



Scanned with CamScanner